**सन २०१४-१५ मध्ये ठाणे, पुणे ,नाशिक, धुळे, नंदूरबार, जळगांव, अहमदनगर, नांदेड, यवतमाळ, गडचिरोली,चंद्रपूर व अमरावती या जिल्हयातील आदिवासी कुटुंबाच्या परसबागेत फळझाड व भाजीपाला लागवडीची योजना राबविण्यास वित्तीय मान्यता देणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः फलयो-२०१४/प्र.क्र.१०४/९अे**

हुतात्मा राजगुरू चौक,मादाम कामा रोड
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
तारीख: ०५/०१/२०१५

वाचा

**१) शासन पत्र ,कृषी व पदुम विभाग,क्र.वानियो-२०१३/प्र.क्र.१५४/१३/भाग-४/२(ए), दि.१७/०४/२०१४**
**२) संचालक फलोत्पादन, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्रमांक- कृषिआ/ फलो-३/मा.सु./१४-१५/१८५२/१४, दि. १ ऑगस्ट,२०१४**
**३) शासन निर्णय क्रमांकः कृषी व पदुम विभाग,क्र.फलयो-२०१४/प्र.क्र.१०४/९अे, दि.१९ जुलै,२०१४**

**प्रस्तावना**

राज्यातील १२ जिल्हयांतील आदिवासी भागातील कुपोषणाचे प्रमाण कमी करण्याच्या उद्देशाने व आदिवासी बांधवांना पौष्टिक आहार पुरविण्यासाठी आदिवासी कुटुंबाच्या घराभोवती असलेल्या परसबागेत पौष्टीक भाजीपाला व फळांची निवड करुन त्याची लागवड करण्यास प्रोत्साहन देण्यासाठी “ आदिवासी जिल्हयात परसबागांची स्थापना (२४०१ ३६५४) ” ही योजना राज्यात सन २००३-०४ पासून राबविण्यात येत आहे. राज्यात आदिवासी भागात कुपोषणाचे प्रमाण जास्त असल्याने त्यांचे आहारात जीवनसत्व व इतर आवश्यक पोषक द्रव्ये उपलब्ध होण्याच्या हेतूने ही पौष्टिक आहार योजना तयार करण्यात आली आहे. सदर योजनेमूळे आदिवासींच्या परसबागेत उपयुक्त फळे व भाजीपाल्याचा समावेश करुन आदिवासी बांधवांचे जिवनमान आरोग्याच्या दृष्टीने परिपूर्ण करता येणे शक्य होईल.

सदर योजना राबविण्याकरिता लागवडीचे उद्दिष्ट, लाभार्थी निवड, लावावयाची फळझाडे/भाजीपाला, लाभ दयावयाचे साहित्य व सामुग्री पुरवठा, अंमलबजावणी करणारी यंत्रणा, लाभार्थी प्रशिक्षण, संनियंत्रण, आढावा व मूल्यमापन आणि योजनेअंतर्गत तपासणीचे निकष इ. संदर्भाधीन दिनांक १६ सप्टेंबर, २०११ च्या शासन निर्णयाने विहित केलेले आहेत.सदर योजने करिता सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात रु. १०.०० लक्ष इतका नियतव्यय उपरोक्त अनुक्रमांक (१) येथील शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन देण्यात आला आहे. वित्त विभागाने निधी वितरणासंदर्भात आखून दिलेल्या मर्यादेनूसार एकुण अर्थसंकल्पीत निधीच्या ६०% निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती

**शासन निर्णय**

राज्यातील ठाणे, पुणे, नाशिक, धुळे, नंदूरबार ,जळगांव, अहमदनगर, नांदेड, यवतमाळ, गडचिरोली, चंद्रपूर व अमरावती या जिल्हयातील आदिवासी कुटुंबाच्या परसबागेत फळझाड व भाजीपाला लागवडीची योजना सन २०१४-१५ मध्ये राबविण्याकरिता रुपये ६.०० लाख (रुपये सहा लाख

फक्त) इतकी रक्कम खर्च करण्यास शासनमान्यता देण्यात येत आहे. दिनांक १६ सप्टेंबर, २०११ च्या शासननिर्णयात विहित केलेल्या पध्दतीनुसार सदर खर्च करण्यात यावा.

२. संचालक ( फलोत्पादन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे हे सदर रक्कमेचे आहरण व संवितरण अधिकारी राहतील. मंजूर निधीचे संबधित जिल्हयांना संगणकीय अर्थसंकल्प वितरणप्रणालीद्वारे वितरण करण्यास त्यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.सदर योजनेसाठी निधी वितरीत करतेवेळी वित्त विभागाने वेळोवेळी दिलेल्या सुचनांचे काटेकोरपणे अवलंब करण्यात यावा. तसेच, आदिवासी कुटुंबामध्ये कुपोषणाचा प्रश्न मोठ्या प्रमाणावर असल्याने विशेष बाब म्हणून ज्या जिल्ह्यातील सर्व आदिवासी शेतकऱ्यांना या योजनेचा यापुर्वी लाभ दिलेला आहे, अशा जिल्ह्यामध्ये ज्या आदिवासी शेतकऱ्यांनी या योजनेमध्ये पुर्वी लाभ घेतलेला आहे त्यांना चक्रीय पध्दतीने किमान ५ वर्षाच्या कालावधी नंतर पुनश्च: लाभ देण्यात यावा.

३. या योजनेसाठी होणारा खर्च रु.६ लाख (रु.सहा लाख फक्त )सन २०१४-१५ या वर्षाकरीता मंजूर व अर्थसंकल्पीत केलेल्या तरतुदीनुसार खालील लेखाशिर्षातून भागाविण्यात यावा.

"मागणीक्र.डी -३,
२४०१- पीक संवर्धन,
(००)(११९), बागायती व भाजीपाला पिके
(०१) (२७) आदिवासी जिल्हयात परसबाग योजना (२४०१ ३६५४)
३३ अर्थसहाय्य."

४. हे आदेश आदिवासी विभागाच्या सहमतीने तसेच त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र. १९,दिनांक ०९/१०/२०१४ तसेच वित्त विभागाच्या मान्यतेने तसेच त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ३८७/१४ / व्यय - १. दिनांक २२/१२/२०१४ अन्वये निर्गमीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०१०५१६०८१३६२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SAKHARKAR AMOL NILKANTH

Digitally signed by SAKHARKAR AMOL NILKANTH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AAHDDF,CID - 920025, postalCode=400032, st=Maharashtra, cn=SAKHARKAR AMOL NILKANTH
Date: 2015.01.05 17:17:32 +05'30'

(अ.नि.साखरकर)
कार्यासन अधिकारी

**प्रत,**

१. मा.मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई-३२.
२. मा.अपर मुख्य सचिव (कृषी) यांचे स्वीय सहाय्यक,कृषि व पदुम विभाग, मंत्रालय , मुंबई.
३. आयुक्त(कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य , पुणे. (१० प्रती)
४. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ,पुणे.

५. संचालक (फलोत्पादन),कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य , पुणे. (१० प्रती)
६. व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र लघु उद्योग विकास महामंडळ, मुंबई
७. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पणन महामंडळ, पुणे
८. उप सचिव (कार्यासन -२-अे) , कृषि व पदुम विभाग , मंत्रालय , मुंबई-३२.
९. उप सचिव (फलोत्पादन) यांचे स्वीय सहाय्यक, कृषि व पदुम विभाग , मंत्रालय , मुंबई-३२.
१०.उप सचिव, (आदिवासी विभाग) , मंत्रालय , मुंबई-३२.
११.उप सचिव, (वित्त विभाग) , मंत्रालय , मुंबई-३२.
१२.उप सचिव( नियोजन विभाग), मंत्रालय , मुंबई-३२.
१३.सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,द्वारा संचालक (फलोत्पादन),कृषिआयुक्तालय, महाराष्ट्र राज्य , पुणे.
१४.सर्व उपविभागीय कृषि अधिकारी, द्वारा संचालक (फलोत्पादन),कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य , पुणे.
१५.ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, विधानभवन, मुंबई (२ प्रती)
१६.महालेखापाल-१-२(लेखा व अनुज्ञेयता) (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
१७.माहिती व जनसंपर्क संचालनालय (प्रसिध्दीसाठी)
१८. कार्यासन ९-अे, निवडनस्ती